


**या जगात स्थायी काय असेल तर तो म्हणजे बदल.**
**जग सतत बदलतं.आपण सतत बदलतो.**
**पण बदलतो म्हणजे काय होतं ?**


यजमान संपादक
**नाम गुम जायेगा ( ठाणे )**

अतिथी संपादक
**दिपा मिट्टिमनी (कॅनडा)**

सहसंपादक
**सोनाली घाटपांडे ( पुणे )**
**स्वप्ना कोल्हे ( नाशिक )**
**रेणूका रेपाळ ( अमेरिका )**
**सुरुचि नाईक ( नागपूर )**
**आनंद माने (सोलापूर)**

अनुदिनी रुपांतर
**सचिन काकडे**


आजचा नेटाक्षरीचा हा अंक समाज बदलाला अर्पित करत आहोत.
कविंच्या नवविचारशक्तीला अर्पित करत आहोत.

## संपादकीय

**या** जगात स्थायी काय असेल तर तो म्हणजे बदल. जग सतत बदलतं. आपण सतत बदलतो. पण बदलतो म्हणजे काय होतं ? आपल्यात बदल पाच प्रकारांनी घडत असतो. आपल्या वस्तु बदलतात. आपल्या जागा बदलतात. आपली माणसं बदलत असतात,. आपण संस्था बदलतो. पण या चाराहून अधिक मोठा बदल असतो विचारांचा. काल वाईट मानले गेलेले विचार आज सर्वमान्य होतात. आणि आज महान मानले जाणारे विचार उद्या अडगळीत पडतात. विचारांच्या बदलाच्या या प्रक्रियेत कवि, लेखक फ़ार मोठा रोल अदा करतो. काल चुकीचं मानलं गेलेलं स्त्री शिक्षण आज सर्वमान्य करण्यात कोण वाघाचा रोल केला असेल तर 'आसूड' कार फुले. ज्ञानेश्वर तुकारामांपासून ते आजच्या अनेक विचारवंतांपर्यंत सर्वांनी विचारांचे हे बदल सुरू ठेवले आहेत.

कवि नेहमीच असे अडचणीत टाकणारे प्रश्न विचारतात. 'गोरी गोरी पान फुलासारखी वहिनी हवी तर काळ्या सावळ्या मुलींनी काय कुणाची वहीनी बनूच नये ? देवासमोर हातच का जोडायचे ? मिठी का नाही ? विवाहित स्त्री सौभाग्यवान तर मग इतर काय दुर्भागी ? आणि विवाहित पुरुष मात्र सौभाग्यवान का नाही ? वंश काय फ़क्त मुलगेच चालवणार ? पहाण्याचा कार्यक्रम फ़क्त मुलिंच्याच वाट्याला का ? असे अनेक प्रश्न कविंनी प्रश्न करावे , जगानेही त्यावर विचार करावा आणि त्यातून जग बदलावे.

आजचा नेटाक्षरीचा हा अंक समाज बदलाला अर्पित करत आहोत. कविंच्या नवविचारशक्तीला अर्पित करत आहोत.

### - अतिथी संपादक -



**दीपा मिट्टीमनी** हे नाव नेटवरील मराठी मंडळींना सुपरिचित आहे. व्यवसायाने चार्टर्ड अकाउंटंट असणाऱ्या आणि कॅनडात वास्तव्य असलेल्या दिपाच्या अनेक कविता गाजल्या आहेत. एन आर आय मंडळींच्या मनाला भिडणारी ' बाप्पा' तर आपण सर्वांनी वाचलीच. दिपाच्या कवीतांमध्ये एक आर्त असतं . पण कविता केवळ भावनांबरोबर वहात जात नाही. त्यांच्या कवितेत विचार असतो. पण कविता वैचारिक रुक्ष नसते. तर्कदुष्ट नसते. भावना आणि विचार यांचा सूरेख संगम त्यांच्या कवितेत असतो. या संगमात सहजता असते. ओढूनताणून आणलेला विचार नसतो. मेड टु ऑर्डर कविता नसते. कारण त्या गद्य लिखाणही करतात. जेव्हा मुद्दाम एखादा विचार मांडायचा तेव्हा त्या गद्यातूनच मांडतात. पण जेव्हा आतून कविताच हाक देते तेव्हा त्या कवितेला न्याय देतात. त्यामुळेच त्यांच्या कवितेतून अशा ओळी भेटतात.

**'बघ परत एकदा हात पसरून**
**पाऊस देईल तुला तुझं तळं**
**बघ परत एकदा खिडकीत बसून**
**आभाळ अजून आहे तसंच निळं'**

सामाजिक बदल, स्त्री, एन आर आय हे त्यांचे विशेष जिव्हाळ्याचे विषय. त्यांच्या कथा आणि इतर ललित लेखन त्यांच्या ब्लॉग वर उपलब्ध आहेच. या अंकात त्यांच्या काही विचारप्रवर्तक कविता समाविष्ट आहेत.

## काळी मैना

एक काळी मैना असते
सारे जग तिला हसते
गोरं व्हायचं स्वप्न बघून
हळदीत थया थया नाचते

तीच काळी मैना आता
मनुष्यजन्मात येते
गोड गुलाबी स्वप्नं बघून
हळद लावायची वाट बघते

फ़ेयर आणि लव्हली लावते
काळा रंग गव्हाळ झाला का बघते
पुर्वजन्मी बगळे हसायचे
आमच्यात यायचं तर हो गोरी, सुंदर, सडपातळ

या जन्मीही अपेक्षा तीच
फ़क्त विशेषणं वाढलीयेत
सुशिक्षित, मनमिळावू, समजूतदार
आणि असंच काही बाही

मैना बिचारी हळदीच्या शोधात
आत्ताशी कुठे पाय पिवळे झालेत
अजून किती जन्म हे असंच चालायचं ?



**दीपा मिट्टीमनी**

## सेकंड हॅंड माल

चला या वर्षी आपलं जमलं बुवा
फुल टू फ़टाकडी पोरगी भेटली
माल...

नशीब आपले चांगले झाले
तशी दिसायलाही छान आणि बोलायलाही
चला, एकदाचे बाबांच्या मनासारखे झाले

आज जरा कट्ट्यावर बढाया मारू
पण कट्ट्यावर नको त्या चौकशा झाल्या

कुणी म्हटले, आधिची माहिती काढली काय ?
कुणी म्हटले , कॉलेजात काय ? एरिया कोणता होता ?
एक जण म्हणाला, "सेकंड हॅंड माल नको हां"



मग माझ्याही मनात हजार शंका
खरंच सेकंड हॅंड माल ?

बस्स कट्ट्यावर टाईमपास करून घरी आलो
बेडरूममध्ये एकटाच बसलो
मनात एकच विचार "सेकंड हॅंड माल"

समोर आरशात नजर गेली
ती "सेकंड हॅंड माल" तर मी ?
मी कोण ?

मी कालेजमध्ये काय केले
माझ्या जीवनात काय केले नाही ?
धूर ओढला, दारूही घेतली... आणि

हे मी पुरुष आहे म्हणून... लाईफ़ एंजाय केलं
पाहीजे ते मिळाले ... मिळवले

ती सेकंड हड माल
तर मी ...?

**रवि मित्र**

## यंदा कर्तव्य आहे

यंदा कर्तव्य आहे
मुलगी हवी सालस
आणि मुख्य म्हणजे
मुलगी हवी काळी

काळी का म्हणून ?
मला आवडते म्हणून
काळ्या रंगाचे स्वतंत्र
अस्तित्व असते म्हणून

दया परोपकार नव्हे हो
साधी आवड माझी
खाली ठेवून बघा रूढ
सादर्य भावनांची ओझी

मग तुम्हाला दिसेल
माझ्या डोळ्यांनी जग
तुम्हालाही ही साधीच
घटना वाटेल मग

यंदा कर्तव्य आहे
मुलगी हवी सालस
आणि मुख्य म्हणजे
मुलगी हवी काळी

**- तुषार जोशी, नागपूर**



## आताशा मला कविता करायचीच लाज वाटते

तुझ्या गालावरच्या खळीने
एक धुंद कविता सुचली बघ मला

पण लिहू गेलो कागदावर
तर दिसल्या असंख्य कळ्या
जन्माआधीच चुरगाळलेल्या
गर्भजलपरीक्षेत नापास झाल्या म्हणून
मला लाज वाटली गं खळीवर कविता करायची

तुझ्या ओठांवरच्या गुलाबांच्या लालीत
मला दिसू लागलं ते गोठलेलं रक्त
जन्मतच दम तोडणारया बालिकांचं
त्या बालिकेचे दूध शोधणारे ओलसर ओठ...
मला शरम वाटली ग ओठांवर कविता करायची

तुझ्या भांगाखालचा सिंदुरी सूर्य बघताना
मला दिसल्या सासुरवाशिणी
हुंड्यासाठी मुकं दुख़ भोगताना

तुझ्या मातृत्वावर कविता लिहू गेलो
तर दिसल्या माता
"मुलगाच व्हावा" म्हणून नवस करणाया
स्वतःच्या स्त्रीपणाची हौस भागलेल्या

तुझ्या वैश्विक शक्तीचा जप करताना
मला दिसतात
बांगला देशात बुरखा न घालणाया मुलींवर पडणारे दगड
(हे हात आता हैदराबादेतही पोचलेत म्हणे)

नेपाळ मलेशियात विकल्या जाणाया मुली
उझबेकिस्तानातून निर्यात होणाऱ्या
पॅरिसच्या झगमगीत अंधारात ...



मी तुझ्यावर कविता करतो
तुझी खळी, तुझे डोळे, तुझे ओठ, तुझे केस...
तुला हरभऱ्याच्या झाडावर चढ़वतो
तुझी पुजा , तुझे दिन साजरे करतो
तुला वाटत असेल
"मी तर जगातली अनमोल चीज झालीय"

कुणाला फ़सवतोय मी ?
तुला ?
जग़ाला ?
की स्वतःला ?

मला आताशा कविता करायचीच लाज वाटू लागलीय
खरं तर...
मला आताशा माणूस म्हणवण्याचीच लाज वाटू लागलीय.

**- नाम गुम जायेगा**

**मंदिरात हल्ली नसतोसच तू**
(श्री सिद्धीविनायकाला अर्पण)

मंदिरात हल्ली नसतोसच तू
कदाचित घुसमटून जात असशील
दर्शनासाठी पैसे मोजताना होणारी
भक्तीची लक्तरं पहातच असशील तू

दुर्वा पेढे एक्स रे मशीनमधला नारळ
सगळाच आता बाजार आहे
एका महानायकाला प्रसिद्धीसाठी
दर्शनासाठी चालत येण्याचा आजार आहे.

तुझ्या अनादी शक्तीला आजकाल
सुरक्षा भिंतींचा पाश आहे
हे ब्रह्मांड, हे चराचर,
नक्की का तुझं आकाश आहे ?

तुझं अस्तित्व असतंच ना ?
रस्त्यावरच्या शेंबड्या मुलांमध्ये ?
त्यांच्या डोळ्यांतील निष्पाप गंध
असतो का रे तुझ्यावरच्या फुलांमध्ये ?

या बाजारात देव होण्याची
किंमत तूही मोजतोस ना ?
हृदयस्थ आर्त प्रार्थनेत कुणाच्या
खरा भक्त शोधतोस ना ?

**---स्वप्ना जोशी**



## पेंडींग लिस्ट

तुझं नांव ऐकलं तेव्हाच मोहरून गेले
तूच तो असे मन्मनी कितीदा येऊन गेले
एका न पाहिलेल्या राजकुमाराची स्वप्ने
मन माझे वेडे तुझ्यामागे धावत गेले
वेडी होते , भेटीसाठी दिवस मोजत गेले
तुला पाहण्याची हुरहुर हळूच लपवत गेले
साऱ्यांसाठी नेहमीचा माझ्यासाठी खास
“बघायला येण्याचा दिवस” धडधड उगाच

तू नुसतं न्याहाळलंस  दुरूनच एकवार
रुपावरून परीक्षा , जाणलेच नाहीस विचार
माझ्या उत्तराची कोणाला गरजच नव्हती
आडून कळवला गेला तुझा मला नकार

परत एक नवीन नाव मी परत मोहरले
कदाचित हा “तो”  असेल मनात येऊन गेले
आशा थोडी मावळलेली नवा हुरूप आणुन गेले
नाव गाव बदलून सारे तीच वृत्ती दावून गेले
दरवेळी प्रसंग तोच पात्रे मात्र बदलून गेली
हवापाणी , रस्ते खड्डे, गप्पा त्याच मारून गेले



राजकुमाराचं स्वप्न हळूहळू विरघळून गेले
जग असं निर्दय एक भयाण वास्तव दावून गेले
“मुलगी नाही मुलगा आहेस” बाबा सांगत गेले
आज मात्र मी त्यांना “का” प्रश्न विचारत गेले
रोज रोज नव्या स्थळांनी बाबा डायरी भरत गेले
पत्रिका, मंगळ असे किनारे लोकही शोधत गेले

परत एक नवीन नाव, मी यांत्रिक होत गेले
वाट बघणे , मोहरणे, कधीचेच हरवून गेले
“पहायचा दिवस” वेळापत्रकात भरून गेले
नेहमीच्या सवयीने स्मितहास्य करून गेले

---दीपा मिट्टीमनी

**नेटाक्षरी टीम तर्फे सर्व रसिकांना मकरसंक्रांतीच्या शुभेच्छा .**




नेटाक्षरी हा अंक विनामूल्य वितरीत केला जातो आपल्या सुचना ,टीका आणि सहकार्य यांचे स्वागत आहे .

netaksharee@gmail.com